<u>सानुग्रह अनुदान मंजूर करणेबाबत.</u>

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग (परिवहन)

**शासन आदेश क्र. एमव्हीडी-१२१९/प्र.क्र.३१८/परि-३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, २ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १६ डिसेंबर, २०१९.

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४,दि.२९/९/२०१८.
२) उप आयुक्त(लेखा) परिवहन आयुक्त कार्यालय यांचे क्र.पआका/का.९/ लेखाविभाग/SGB/जा.क्र.१६८४७, दि.२१/११/२०१९ चे पत्र.
३) कार्यालय प्रमुख तथा प्रादेशिक परिवहन अधिकारी,नांदेड यांचे दि.१२/९/२०१९ चे पत्र.
४) कै.श्याम गणपत बिराजदार यांचे नामनिर्देशित व्यक्ती श्रीमती संध्या श्याम बिराजदार यांचा दि.१९/११/२०१८ चा अर्ज.

## आदेश

उपरोक्त क्र.२ अन्वये उप आयुक्त (लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई व क्र.३ अन्वये कार्यालय प्रमुख तथा प्रादेशिक परिवहन अधिकारी, नांदेड यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत क्र.४ येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग प्रमुख हे त्यांना संदर्भ क्र.१ येथील वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९/९/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुससार, कै.श्याम गणपत बिराजदार यांच्या नामनिर्देशित व्यक्तीस म्हणजे श्रीमती संध्या श्याम बिराजदार,पत्नी यांना सानुग्रह अनुदान रुपये १०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लाख फक्त) मंजूर करीत आहेत. सदर सानुग्रह अनुदान शासकीय कर्मचारी सेवेत असताना १० वर्ष शासन सेवा होण्यापूर्वी दि.१७/१/२०१६ रोजी मृत्यू पावल्यामुळे मंजूर करण्यात येत आहे. सदर आदेश आदेशाच्या दिनांकापासून १ वर्षे कालावधीसाठी ग्राह्य राहतील.

सदरचा खर्च “मागणी क्र.जी-६ २०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ ०१ नागरी १०३ अनुकंपा भत्ते(००)(०६)-परिभाषित अंशदान/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत सानुग्रह अनुदान (२०७१०७२२)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

सदरचा शासन आदेश वरील संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील अ.क्र.५ येथे नमूद केल्यानुसार प्रशासकीय विभाग प्रमुख यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेताक २०१९१२१६११४१०८५१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arjun Sampat Waghmode

Digitally signed by Arjun Sampat Waghmode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa36f850da37bfbe62486d2bab04146cb40b5662724fae653d0947d157f6450, serialNumber=ae0e4de46520602899a22015dac4a9cedaae6d43ca3fcb9262b2280e43ecfce7, cn=Arjun Sampat Waghmode
Date: 2019.12.16 15:17:34 +05'30'

**(अर्जुन सं. वाघमोडे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) उप आयुक्त (लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना योग्य त्या कार्यवाहीस्तव.
३) संबंधित अधिदान व लेखा अधिकारी/ कोषागार अधिकारी.
४) प्रादेशिक परिवहन अधिकारी, नांदेड.
५) श्रीमती संध्या श्याम बिराजदार यांना माहितीस्तव प्रत.
६) निवड नस्ती (परि-३).